स्थानिक स्वराज्य संस्था (महानगरपालिका/ नगरपरिषद/जिल्हा परिषद) यांनी उच्च माध्यमिक शाळा सुरु करण्यासंदर्भात....
पुणे महानगरपालिकेद्वारे संचलित उर्दु माध्यमिक विद्यालय, बोपोडी विद्यालयास स्वयंअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ देण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रिडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः एसएफएस-१०२४/प्र.क्र.७९/एसएम- २
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०६ मार्च, २०२४.

वाचा -

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक: नमाशा-२००९/(४९७/०९)/ माशि-१, दिनांक ११ जून, २००९.
२) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांचे पत्र क्र. शिसं/ माध्य/ स्वयंअर्थ/२०२३-२४/ एस-४/६१०, दि. ०८/०१/२०२४.

प्रस्तावना :-

पुणे महानगरपालिकेद्वारे संचलित उर्दु माध्यमिक विद्यालय, बोपोडी विद्यालयास स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर शैक्षणिक वर्ष २०२४-२५ पासून स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ मिळणेबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. (२) अन्वये शासनास प्राप्त झाला होता. सदर शाळेस स्वंयअर्थसहाय्यित तत्वावर दर्जावाढ परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

१. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ (सन २०१३ चा ०१) अंतर्गत पुणे महानगरपालिकेद्वारे संचलित उर्दु माध्यमिक विद्यालय, बोपोडी विद्यालयास दर्जावाढ करण्यास सन २०२४-२५ या शैक्षणिक वर्षापासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन स्तरावरुन परवानगी देण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | शाळेचे नाव व पत्ता | माध्यम | मंडळ | शाळेचा प्रकार |
|---|---|---|---|---|
| १ | उर्दु माध्यमिक विद्यालय, बोपोडी, पुणे-४११ ०२०. | उर्दु | राज्यमंडळ | दर्जावाढ, प्राथमिक ते माध्यमिक शाळेला जोडून उच्च माध्यमिक (इ. ११ वी ते इ. १२ वी, सर्व शाखा) |

अटी व शर्ती :-

I. सदर प्राथमिक ते माध्यमिक शाळेस जोडुन उच्च माध्यमिक दर्जावाढ करण्याकरीता आवश्यक व यापुढे येणाऱ्या कोणत्याही खर्चाकरिता, राज्य शासनाकडून प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष असे कोणतेही वित्तीय सहाय्य / अनुदान उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

II. माध्यमिक शाळांबाबतचे शासनाचे प्रचलित धोरण व निकष यांचे पालन करणे तसेच शाळेमध्ये आवश्यक वर्गखोल्या, सर्व भौतिक व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देणे अनिवार्य राहील.

III. महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ अन्वये निर्धारित केलेल्या सर्व मानकांचे, अटींचे व शर्तींचे आणि या अधिनियमांन्वये शासनाने दिलेल्या निदेशांचे किंवा शासनाने वेळोवेळी विनिर्दिष्ट केलेल्या मानकांचे किंवा अटीं व शर्तींचे पालन करणे अनिवार्य राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिद्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३०६१६२३२७९५२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb1318374f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E27CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.03.06 16:32:38 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
३. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे.
५. आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे.
६. शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक), जिल्हा परिषद, पुणे.
७. निवडनस्ती (७९/२०२४/एसएम-२).